**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असतांना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या <u>कुटूंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत</u>.**
**दिवंगत सुधीर पंचम राऊत, शिपाई.**




# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन ज्ञापन क्र. अनुदान-२०२२/प्र.क्र.९५/ई-७**

मंत्रालय (मुख्य इमारत), पहिला मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ मार्च, २०२३.

**<u>संदर्भ</u> :-** (१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९/०५/२०२०, दि.१४/१०/२०२० व दि.१४/०५/२०२१.
(२) जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचे पत्र क्र.कावि/आ.व्य./कोरोना विषाणू/२०२१/९७५, दि.०२/०६/२०२१.

**<u>शासन ज्ञापन</u>** :-

संदर्भाधीन क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ मे, २०२० अन्वये कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर या आस्थापनेवर कार्यरत असलेले कर्मचारी दिवंगत सुधीर पंचम राऊत, शिपाई यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य पार पाडतांना कोरोना विषाणू संसर्गाने दिनांक ११/०४/२०२१ रोजी मृत्यू झाला आहे.

३. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी दिवंगत सुधीर पंचम राऊत, शिपाई यांच्या कुटूंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९/०५/२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रूपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये सादर केला आहे.

४. दिवंगत सुधीर पंचम राऊत, शिपाई हे "कोव्हिड-१९" च्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने "प्रतिबंध" करण्याचे कर्तव्य बजावत होते आणि ते मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कर्तव्यावर हजर होते असे, जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी प्रमाणित केले आहे.

५. तसेच दिवंगत सुधीर पंचम राऊत, शिपाई यांचा मृत्यू हा "कोव्हिड-१९" या विषाणूशी संबंधित आहे, असे संबंधित जिल्हा रूग्णालय चंद्रपूर यांच्या अहवालात नमूद करण्यात आले आहे.

६. त्यानुसार जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांच्या आस्थापनेवरील कार्यरत कर्मचारी दिवंगत सुधीर पंचम राऊत, शिपाई यांच्या नामनिर्देशित व्यक्तीस / कायदेशीर वारसास रू.५०,००,०००/- (रूपये पन्नास लक्ष फक्त) इतकी रक्कम सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

७. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च खाली नमूद लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

**"मागणी क्र.सी.१, २०५३, जिल्हा प्रशासन ००, ०९३ - जिल्हा आस्थापना, ०१ - सर्वसाधारण आस्थापना, (०१) (०५) आयुक्त नागपूर (२०५३ ०१०८) (अनिवार्य), १३-कार्यालयीन खर्च"**

त्याकरीता **विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर** यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२३०३१७१५१५३१६८१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2023.03.17 15:19:58 +05'30'

**( संजय बनकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

(१) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
(२) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
(३) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
(४) महालेखापाल (लेखा व हकदारी / लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
(५) जिल्हाधिकारी, चंद्रपूर
(६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
(७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
(८) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
(९) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
(१०) कार्यासन अधिकारी (व्यय-९ / अर्थसंकल्प-६), वित्त विभाग, मुंबई
(११) दिवंगत सुधीर पंचम राऊत, शिपाई यांचे कुटुंबीय (जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचेमार्फत)
(१२) निवडनस्ती (कार्यासन ई-७).